महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ याच्या कलम १८२ अन्वये सामाजिक न्याय विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या योजनांना सहायक अनुदाने वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.**

**शासन निर्णय क्रमांक :- बीसीएच-२०११/प्र.क्र.३२०/मावक-४**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.**

**दिनांक :- २८ सप्टेंबर, २०११**

पहा : शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.: अंदाज-२०११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दि:६.५.२०११

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १८२ अन्वये सामाजिक न्याय विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या योजनांना २२२५ ०८८९ या लेखाशिष खाली सन २०११-१२ या वित्तीय वर्षासाठी रु.८,५८,७५,०००/- इतकी तरतुद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. सदर तरतुदीपैकी रु.५,००,७९,०००/- इतकी तरतुद अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरित करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तावित वितरीत करावयाचा निधी खर्च केल्यानंतर त्याबाबतची जिल्हानिहाय खर्चाची माहिती तसेच उर्वरित कालावधीसाठी आवश्यक निधीची विगतवारी सर्व संबंधित जिल्ह्याकडून संचालक, समाजकल्याण, पुणे यांनी शासनास सादर करणे आवश्यक राहील. विहित वेळेत जिल्हानिहाय खर्चाची माहिती प्राप्त झाली नाही आणि उर्वरित निधी वितरित करण्यास वित्त विभागामार्फत विलंब झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४२/व्यय-१४, दि.२३.८.२०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०९२८११३२२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सही/-

**(शि.सो.चौरे)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा परिक्षा) (लेखा अनुज्ञेयता ) मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा परिक्षा) (लेखा अनुज्ञेयता ) नागपूर.

सर्व जिल्हाधिकारी,

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी,

सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षक, मुंबई / मुंबई उपनगर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
अवर सचिव, व्यय-१४, वित्त.विभाग, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव, अर्थसंकल्प, सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती-मावक-४.